साखर आयुक्त, पुणे यांच्या अधिपत्याखाली सोलापूर येथे प्रादेशिक सह संचालक ( साखर ) या नवीन कार्यालयाची निर्मिती करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन,**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ससाका-२०१६/प्र.क्र.२०५/२५स,**
मंत्रालय , मुंबई ४०० ०३२,
दिनांक: २४.०१.२०१९

**वाचा:-**१. शासन निर्णय,सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,क्रमांक:-राजस-१००८/प्र.क्र.५३८/५-स, दि.५/५/२०११.
२. सहकार आयुक्त व निबंधक, पुणे यांचे पत्र क्र. आस्था / कक्ष-१ / सुधा. आकृतीबंध / पदेवाटप /२०११, दि. २८/१२/२०११.
३. वित्त विभाग पृष्ठांकन क्र. पदानि २०१८/ प्र.क्र.११८/१८/ आपुक दि.१.१.२०१९

**प्रस्तावना :-**

साखर आयुक्त यांच्या अधिपत्याखाली राज्यात सद्यस्थितीत पुणे,कोल्हापूर, नांदेड, अमरावती, औरंगाबाद, अहमदनगर आणि नागपूर असे ७ प्रादेशिक विभाग कार्यरत आहेत. पुणे प्रादेशिक विभागात एकूण सहकारी व खाजगी ६८ साखर कारखाने आहेत. त्यापैकी फक्त सोलापूर जिल्ह्यात ३७ साखर कारखाने आहेत. याशिवाय खाजगी तत्वावर ८ साखर कारखान्यांचे काम प्रगतीपथावर आहे. ह्या सर्व कारखान्यांच्या प्रतिनिधीना वेळोवेळी कार्यालयीन कामासाठी प्रादेशिक सह संचालक (साखर), पुणे येथे जावे लागते. महाराष्ट्राच्या एकूण ऊस गाळपापैकी २०.५९ % गाळप सोलापूर जिल्ह्यात होते. पुणे प्रादेशिक विभागात मोठ्या प्रमाणातील साखर कारखान्याची संख्या असल्यामुळे प्रादेशिक सह संचालक (साखर), पुणे ह्या कार्यालयातील कामाचा व्याप वाढत आहे. त्यामानाने सदर कार्यालयातील मंजूर कर्मचारी वर्ग अत्यंत अपुरा आहे. सबब एकट्या सोलापूर जिल्ह्यातील साखर कारखान्याची संख्या आणि उस गाळपाचे प्रमाण विचारात घेवून सोलापूर येथे स्वतंत्र प्रादेशिक सह संचालक (साखर), सोलापूर हे प्रादेशिक कार्यालय सुरु करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सोलापूर जिल्ह्यातील साखर कारखान्यांची संख्या आणि ऊस गाळपाचे प्रमाण विचारात घेवून सहकार पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या पदांच्या आढाव्याअंतर्गत विचाराधीन ३८६ पदे समर्पित करण्याच्या अटीच्या अधीन राहून आणि त्यामुळे होणारी आर्थिक बचत लक्षात घेवून सोलापूर येथे स्वतंत्र प्रादेशिक सह संचालक (साखर), सोलापूर हे नविन प्रादेशिक कार्यालय सुरु करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. विभागाच्या पदांच्या आढाव्याअंतर्गत विचाराधीन ३८६ पदे समर्पित करण्याची आस्थापना (५-स) कार्यासनाने दक्षता घ्यावी. नवनिर्मित प्रादेशिक सह संचालक (साखर), सोलापूर या प्रादेशिक कार्यालयासाठी उच्चस्तर सचिव समितीच्या मान्यतेने वर नमूद केलेल्या अटीच्या अधीन राहून खालीलप्रमाणे ८ पदे मंजूर करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | पदनाम | मंजूर पदे | वेतनश्रेणी | पदभरतीचा मार्ग |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५. |
| १ | सह संचालक | १ | १५६००-३९१०० + ग्रेड पे ६६०० | नवीन पदनिर्मिती |
| २ | उप संचालक | १ | १५६००-३९१०० + ग्रेड पे ५४०० | लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, पुणे या कार्यालयातील उप निबंधक, सहकारी संस्था हे पद कायम स्वरूपी समावेशनाने उपलब्ध करून देण्यात येत आहे. |
| ३ | सहकार अधिकारी श्रेणी-२ | १ | ९३००-३४८०० + ग्रेड पे ४२०० | हे पद लेखा अधिकारी (Audit) किंवा तत्सम पद कायमस्वरूपी वर्ग करून भरण्याचे आदेश सहकार आयुक्त तथा निबंधक ,पुणे यांनी तात्काळ निर्गमित करावेत. |
| ४ | वरिष्ठ लिपिक | १ | ५२००-२०२०० + ग्रेड पे २४०० | लेखा परीक्षण विभागाकडील उप लेखा परीक्षक संवर्गात रिक्त पदामधून कायमस्वरूपी समावेशनाने उपलब्ध करून देण्याचे आदेश सहकार आयुक्त तथा निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांनी तात्काळ निर्गमित करावेत. |
| ५ | कनिष्ठ लिपिक | १ | ५२००-२०२०० + ग्रेड पे १९०० | प्रशासनाकडील सध्या मंजूर रिक्त असलेल्या कनिष्ठ लिपिक, लघु टंकलेखक, वाहनचालक आणि शिपाई पदामधून कायमस्वरूपी सदर ४ पदे वर्गीकरणाने उपलब्ध करून देण्याचे आदेश सहकार आयुक्त तथा निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांनी तात्काळ निर्गमित करावेत. |
| ६ | लघु टंकलेखक | १ | ५२००-२०२०० + ग्रेड पे २४०० | |
| ७ | वाहनचालक | १ | ५२००-२०२०० + ग्रेड पे १९०० | |
| ८ | शिपाई | १ | ४४४०-७४४० + ग्रेड पे १३०० | |
| | एकूण | ८ | | |

२. नवनिर्मित प्रादेशिक सह संचालक (साखर) या कार्यालयाअंतर्गत सोलापूर आणि उस्मानाबाद (धाराशिव) जिल्ह्यातील सर्व साखर कारखान्यांचे नियंत्रण राहील. शासन अधिसूचना सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.सी एस सी१०९२/८७०/३३/१५-सी, दि.२५.११.१९९२ आणि साखर

आयुक्तालयाचे आदेश क्र.साआ/प्रशा/जॉब चार्ट/१९९१, दि.६.१०.१९९३ मधील निर्देशाप्रमाणे प्रादेशिक सह संचालक (साखर) सोलापूर यांनी कार्यालय प्रमुख व विभागीय प्रमुख म्हणून कामे पहावीत.

३. नवनिर्मित प्रादेशिक सह संचालक (साखर) या कार्यालयासाठी जी मंजूर पदे समावेशनाने आणि वर्गीकरणाने कायम स्वरुपात उपलब्ध करून देण्याचे आदेश सहकार आयुक्त आणि निबंधक, सहकार संस्था, पुणे यांनी तत्काळ निगमित करावेत. तसेच मंजूर ८ पदे प्रचलित नियमानुसार भरण्याबाबत सहकार आयुक्त आणि निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांनी आवश्यक कार्यवाही तात्काळ करावी. त्याचप्रमाणे सदर कार्यालय प्रत्यक्ष कार्यान्वित झाल्यावर प्रादेशिक सह संचालक ( साखर ), पुणे यांनी सोलापूर आणि उस्मानाबाद ( धाराशिव ) जिल्ह्यातील सर्व साखर कारखान्यांशी संबंधित कागदपत्र आवश्यक पुढील कार्यवाहीसाठी प्रादेशिक सह संचालक ( साखर ), सोलापूर यांच्याकडे हस्तांतरित करावीत.

४. नवनिर्मित प्रादेशिक सह संचालक (साखर), सोलापूर हे कार्यालय सुरु करण्यासाठी येणारा खर्च आणि मंजूर पदांच्या वेतन भत्त्यावरील व वेतनेतर खर्च " मागणी क्र. व्ही-२ , २४२५- सहकार ००१ संचालन व प्रशासन (०१) संचालन व प्रशासन (०१) (०८) साखर आयुक्तालयाचे बळकटीकरण (२४२५ १०५४) अनिवार्य " ह्या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षापासून उपलब्ध तरतुदीमधून करण्यात यावा. त्यासाठी प्रादेशिक सह संचालक (साखर), सोलापूर यांना " नियंत्रण अधिकारी " आणि उप संचालक (साखर ) सोलापूर यांना " आहरण व संवितरण अधिकारी " म्हणून घोषित करण्यात येत आहे. साखर आयुक्त, पुणे यांनी सदर कार्यालयासाठी जागा भाड्याने घेण्याबाबत व सदर नवीन प्रादेशिक सह संचालक (साखर) या कार्यालयासाठी आवर्ती व अनावर्ती खर्चासाठी आवश्यक असणारी जादा तरतूद मंजूर करून घेण्यासाठी व कार्यालय तातडीने कार्यान्वित होण्यासाठी आवश्यक कार्यवाही करावी.

५. प्रस्तुत शासन निर्णय उच्चस्तर सचिव समितीच्या दि.१५.१२.२०१८ च्या बैठकीत विषय क्र.४/१८ बाबत समितीने घेतलेल्या निर्णयानुसार आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२७/आपुक, दि.१०.१.२०१९ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१९०१२४१४२३०३६७०२** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pramod Mankoji Valanj

Digitally signed by Pramod Mankoji Valanj
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Operation, Marketing and Textiles Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e9e7fafe78ccbad1148295b75b2b4a0fc30e01ea267cb61e5d741e2bf211f323, cn=Pramod Mankoji Valanj
Date: 2019.01.24 16:01:00 +05'30'

**( प्रमोद वळंज )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

३) सर्व मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधान परिषद, विधानभवन, मुंबई
५) सर्व मा.संसद सदस्य, मा.विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य
६) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
७) सर्व मंत्रालयीन विभागांचे मा.अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
८) सचिव, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई
९) सचिव, राज्य मुख्य माहिती आयुक्त, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई
१०) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
११) प्रबंधक, लोकायुक्त/उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१२) प्रधान महालेखापरिक्षक, लेखा परिक्षा, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे (३ प्रती)
१४) सहकार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, दुसरा मजला, नवीन मध्यवर्ती इमारत,
१५) आंबेडकर वेलस्ली रोड, पुणे (३ प्रती)
१६) कृषि आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१७) सर्व जिल्हाधिकारी, महाराष्ट्र राज्य
१८) महालेखापाल -१, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा) मुंबई.
१९) महालेखापाल -२, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा) नागपूर
२०) लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई.
२१) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
२२) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे / सोलापूर
२३) सर्व प्रादेशिक सहसंचालक (साखर)
२४) प्रादेशिक सहसंचालक (साखर), सोलापूर द्वारा साखर आयुक्त, पुणे
२५) संचालक (प्रशासन), साखर आयुक्तालय, साखर संकुल, पुणे.
२६) लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे (३प्रती)
२७) वित्त विभाग ( अर्थसंकल्प -३/ व्यय-२/वित्तीय सुधारणा-१/ आ.पू.क. )मंत्रालय, मुंबई
२८) विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
२९) उप सचिव ( आस्था ) / ( अर्थसंकल्प), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
३०) सर्व अधिकारी / कार्यासने, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
३१) निवड नस्ती कार्यासन २५-स / ३-स